**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग (खुद्द) साठी बाह्य यंत्रणेकडून मासिक दराने शिपाई पुरविण्यासाठी माहे फेब्रुवारी, २०२० ते डिसेंबर,२०२० या कालावधीसाठी करार करणेबाबत.**

<u>महाराष्ट्र शासन</u>

**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक: इएसटी ०१२०/प्र.क्र.०७/प्रशा-४**

मंत्रालय (विस्तार), मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १२ फेब्रुवारी, २०२०.

**संदर्भ** : १) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.पदनि-२०१०/८४/१०/विसु-१, दि.२७.९.२०१०
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.पदनि-२०१३/प्र.क्र.११/१३/विसु-१, दि.२.२.२०१३
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.पदनि-२०१३/(११२)/१३/विसु-१, दि.२.१२.२०१३

**प्रस्तावना :**

उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या आस्थापनेवर ११ शिपायांची पदे बाह्य यंत्रणेकडून भरण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. त्यानुसार वित्त विभागाच्या उपरोक्त संदर्भाधीन क्र.२ व ३ येथील परिपत्रकामध्ये दिलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार ई-निविदा मागविण्याच्या विहित कार्यपद्धतीचा अवलंब करुन सर्वात कमी दर असणाऱ्या "श्री  कन्सल्टन्सी सर्विसेस, मुंबई" या पुरवठादार संस्थेकडून दि.२.१२.२०१३ च्या शासन निर्णयातील अटी व शर्तीच्या अधीन राहून माहे फेब्रुवारी,२०२० ते डिसेंबर,२०२० या कालावधीकरिता या विभागाच्या आस्थापनेवर ११ शिपाई यांची निवड करण्याची तसेच याबाबत संस्थेशी करावयाचा करार व उमेदवारांकडून घ्यावयाची बंधपत्रे याबाबतची कार्यवाही विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग (खुद्द) करीता मासिक ठोक दराने एकूण ११ शिपाई माहे फेब्रुवारी,२०२० ते डिसेंबर,२०२० या ११ महिन्याच्या कालावधीकरिता उपलब्ध करुन देण्यासाठी "श्री कन्सल्टन्सी सर्विसेस." या संस्थेची पुढील दर आणि अटी व शर्तीनुसार नियुक्ती करण्यात येत आहे.

**दर, अटी व शर्ती**

१) उपरोक्त मनुष्यबळाची नेमणूक ही पूर्णत: कंत्राटी पध्दतीने असेल.
२) उपरोक्त नमूद कर्मचारी यांना शासकीय कर्मचारी म्हणून गणले जाणार नाही.
३) शिपायाच्या वेतनाचा मासिक ठोक दर रु.१५,३०६/- राहील.
४) देयक सादर करताना त्यामध्ये कर्मचारी राज्य विमा योजना (ESIC) व कर्मचारी भविष्य निधी (Employees Provident Fund) ची रक्कम भरणा करुन त्याप्रमाणे दर्शविण्यात यावी..
५) कराराचा कालावधी माहे फेब्रुवारी,२०२० ते माहे डिसेंबर,२०२० असा राहील.
६) शिपाई भारतीय नागरीक असावा. तसेच त्यास मराठी लिहिता/ वाचता/ बोलता येणे आवश्यक राहील.

६.१) शिपायाची वैयक्तिक माहिती शासनाच्या मागणीनुसार पुरविण्यात यावी. (शैक्षणिक अर्हता, कायम व सध्याचा पत्ता, नमुना स्वाक्षरी व पासपोर्ट साईज फोटोग्राफ)

६.२) पोलीस पडताळणीसह आपल्या संस्थेचे ओळखपत्र देण्यात यावे.

६.३) शिपायाच्या नियमित वेतन प्रदानाविषयी संस्थेने महिना पूर्ण झाल्यानंतर पहिल्या आठवडयाच्या पहिल्या कार्यालयीन दिवशी हजेरीपटासह कार्यपूर्ती अहवाल सादर करणे गरजेचे राहिल.

६.४) शिपायाकडून होणाऱ्या शासकीय नुकसानाची जबाबदारी संबंधित संस्थेची राहील.

६.५) संस्थेमार्फत पुरविण्यात येणारे शिपाई विनम्र वागणुकीचे, सहकारी वृत्तीचे असावे.

६.६) वैद्यकीय भत्ता/ खर्चाची जबाबदारी संस्थेची राहील.

२. संस्थेतर्फे पुरविण्यात येणारा शिपाई गुन्हेगारी पार्श्वभूमीचा किंवा प्रवृत्तीचा नसावा.

३. शिपायासोबत त्याचे ओळखपत्र (आधारकार्ड/निवडणूक ओळखपत्र/पॅन कार्ड यापैकी एक) त्याच्याजवळ असावे.

४. कंपनी/संस्थेतर्फे काम करणाऱ्या शिपाई यांच्या सेवेचे कोणतेही उत्तरदायित्व शासनावर राहणार नाही. (मूळ स्त्रोतातून कर, जीपीएफ, इपीएफ आणि सीपीएफ वजावट होणार नाही.)

५. कराराचे पालन समाधानकारकपणे न झाल्यास करार केव्हाही संपुष्टात आणणे किंवा कराराची मुदत वाढविणे याबाबतचा अंतिम निर्णय शासनाचा राहील.

६. शिपाई मध्येच सोडून गेल्यास त्या दिवसाचे वेतन देय होणार नाही. तसेच सदर शिपायाच्या बदली उमेदवार उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी संबंधित संस्थेची असेल.

७. करारातील वरील अटी व शर्ती मान्य असल्याबाबत व विहित वेळेत शिपाई उपलब्ध करुन देणेबाबत रुपये २००/- च्या स्टॅम्प पेपरवर करारनामा करुन देणे आवश्यक आहे. त्यानुसार वरील संस्थेकडून करारनामा करुन घेण्यात येईल.

८. शासकीय गोपनीयता अबाधित राहील याची दक्षता संबंधित संस्था घेईल.

यास्तव होणारा खर्च मागणी क्र. के-८, ३४५१, सचिवालयीन- आर्थिक सेवा, (०९०) सचिवालय, (००)(००)(०१) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग (अनिवार्य) , १३, कार्यालयीन खर्च (३४५१००७३) या लेखाशिर्षाखाली २०१९-२०२० या आर्थिक वर्षासाठी मंजूर केलेल्या तरतूदीतून मासिक निधी वितरणाच्या मर्यादेत भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००२१४११२००४७४१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rajendra S Kaurte

Digitally signed by Rajendra S Kaurte
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Industries Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ed4c738df60ac2ac776b9e2481f77ad50aba9dc28bb31a482e03c7ee7b6f64d8, serialNumber=7caa550613a8c4cb7c593368faa24e20d6f8985f510118e6fc1af8b04a443ee8, cn=Rajendra S Kaurte
Date: 2020.02.14 11:21:16 +05'30'

**( रा.शा.कौरते )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
३. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
४. प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहाय्यक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
५. श्री कन्सल्टन्सी सर्विसेस , १०१, ए विंग, पारसमणी को.ऑ.सो.लि. न्यू मानेकलाल इस्टेट, संत नरसी मेहता रोड, जागृती नगर मेट्रो स्टेशनजवळ, घाटकोपर (पश्चिम), मुंबई-४०० ०८६.
६. उप सचिव (प्रशासन), उद्योग, ऊर्जा व कामगार, मंत्रालय, मुंबई,
७. उप सचिव (कामगार), उद्योग, ऊर्जा व कामगार, मंत्रालय, मुंबई,
८. अवर सचिव (प्रशा-१), उद्योग, ऊर्जा व कामगार, मंत्रालय, मुंबई,
९. कक्ष अधिकारी (रोखशाखा), मंत्रालय, मुंबई
१०.निवड नस्ती.